**श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२),छत्रपती संभाजी नगर क्र.५ यांचे निलंबनाबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**आदेश क्रमांक : विभाचौ-२०२४/प्र.क्र.८५/म-१(धोरण)**
दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा,मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय(विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक :१४ मार्च, २०२४.

**आदेश**

ज्याअर्थी, श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२) यांनी सह दुय्यम निबंधक (वर्ग-२), छत्रपती संभाजी नगर क्र.५ या कार्यालयात कार्यरत असताना मौजे माळीवाडा-अब्दीमंडी, ता.जि.छत्रपती संभाजी नगर येथील गट क्र.११, १२, २६, ३७ व ४२ मधील एकूण २५० एकर एवढ्या मिळकतीबाबत ई.पी.सरकार असे नमूद असतानाही दि.९.११.२०२३ रोजी खरेदी-विक्री व्यवहाराची नोंदणी करताना निर्वासित मालमत्ता व्यवस्थापन अधिनियम, १९५० च्या तरतूदी व महाराष्ट्र जमीन महसूल संहिता अधिनियम, १९६६ मधील तरतूदींचे सर्रासपणे उल्लंघन करून शासन महसूलाचे नुकसान केल्याचे प्रथमदर्शनी निर्दशनास आले आहे.

२. ज्याअर्थी, श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२), छत्रपती संभाजी नगर क्र.५ येथे कार्यरत असताना निर्वासित मालमत्ता व्यवस्थापन अधिनियम, १९५० मधील तरतूदी, महाराष्ट्र जमीन महसूल संहिता अधिनियम, १९६६ मधील तरतूदी व जिल्हाधिकारी यांच्या दि.१७.१०.२०२३ रोजीच्या आदेशाच्या अंमलबजावणीमधील नियमबाह्य वस्तुस्थिती विचारात न घेता, अत्यंत घाईने व अनुचितपणे निर्वासित मालमत्तेची नोंदणीकृत खरेदी खताद्वारे नियमबाह्य रितीने हस्तांतरीत करण्यात आली आहे. दि.०९.११.२०२३ रोजी सदर मिळकतीचे खरेदीखत नोंदणीकृत करताना श्री. जी. ए. राजपूत, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, छत्रपती संभाजी नगर क्र.५ यांनी नोंदणी अधिनियम, १९०८ व महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१ मधील तरतुदींचे पालन केले नसल्याची बाब प्रथमदर्शनी निदर्शनास आली असल्याने श्री.जी.ए.राजपूत यांच्या विरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या तरतूदीनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्याचे योजिले आहे.

३. त्याअर्थी, आता, श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२), छत्रपती संभाजी नगर क्र.५ हे महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ४ च्या पोट-नियम (१) च्या खंड (अ) च्या तरतूदीनुसार या आदेशाच्या दिनांकापासून ते पुढील आदेश काढले जाईपर्यंत निलंबित राहतील.

४. त्याअर्थी, आणखी असाही आदेश देण्यात येत आहे की, हा आदेश अंमलात असेल तेवढ्या कालावधीत श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२), छत्रपती संभाजी नगर क्र.५ यांचे मुख्यालय हे सह जिल्हा निबंधक (वर्ग-१) तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, जालना, जि. जालना येथे राहील आणि श्री. जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२) यांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय मुख्यालय सोडता येणार नाही.

५. ज्याअर्थी, निलंबन आदेश अस्तित्वात राहतील त्या कालावधीसाठी श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२) यांना, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ६८ व नियम ६९ अन्वये निर्वाहभत्ता व त्यावरील इतर भत्ते सह जिल्हा निबंधक तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, जालना, जि. जालना यांच्या कार्यालयामार्फत देय राहतील.

६. त्याअर्थी, निलंबन कालावधीत श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२) यांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम १६ मधील तरतूदीनुसार, कोणतीही खाजगी नोकरी स्वीकारता येणार नाही अथवा कोणताही व्यवसाय करता येणार नाही. जर, श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२) यांनी खाजगी नोकरी स्वीकारली अथवा काही व्यवसाय केला तर, गैरवर्तणूकीबाबत त्यांना दोषी समजण्यात येऊन, त्याप्रमाणे त्यांचेविरुध्द कारवाई करण्यास ते पात्र होतील आणि अशा परिस्थितीत ते निर्वाहभत्ता मिळण्याचा हक्क गमावतील.

७. सदर आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१५११५९०४५८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1085617af371f507cb8ee4d914eb645d92480247b61bd58b5c3074ba3a6a62d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2024.03.15 12:08:26 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२), छत्रपती संभाजी नगर क्र.५.

**प्रत माहिती तथा आवश्यकत्या उचित कार्यवाहीस्तव अग्रेषित,**

१) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना विनंती करण्यात येते की, सदरील आदेश श्री.जी.ए.राजपूत, सह दुय्यम निबंधक (वर्ग-२) यांना आजच खास दुतामार्फत किंवा प्रचलित असलेल्या तरतूदीनुसार बजावून, त्यांची दिनांकासहीत स्वाक्षरीची पोच तथा प्रत शासनास परत पाठवावी.
२) नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक कार्यालय, छत्रपती संभाजी नगर विभाग, छत्रपती संभाजी नगर.
३) सह जिल्हा निबंधक (वर्ग-१) तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, जालना, जि. जालना.
४) निवडनस्ती, कार्यासन म-१(धोरण),मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.